GR-2004100414274560२-1201
विदर्भ विकास कार्यक्रमांतर्गत सिंचना-
साठी कूपनलिका कार्यक्रम रा. विण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
क्र. लपायो १०९६/प्र.क्र. ५२७/ जल- २३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक २८ जुलै, १९९७

वाचा :- शा. नि. ग्रा. वि. व ज. सं. वि. क्र. गंकयो-१०९७/प्र. क्र. ९/जल-१७,
दिनांक २०. २. ९७

प्रस्तावना :-

विदर्भ विकास कार्यक्रमांतर्गत नाबार्डच्या अर्थसहाय्याने सिंचनासाठी कूपनलिका योजना राबविण्याचा कार्यक्रम समावेश करण्यास मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली होती. त्या अनुषंगाने भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या अहवालानुसार शासनाने प्रकल्प तयार करून, मंत्रीमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करावयाचा होता. भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या अहवालानुसार विदर्भातील अमरावती, अकोला, बुलढाणा, नागपूर, भंडारा, चंद्रपूर व यवतमाळ या ७ जिल्ह्यांत अंदाजे १८२२४ कूपनलिका सिंचनासाठी घेता येतील व त्याद्वारे साधारणतः ९११२० हेक्टर क्षेत्र शाश्वत सिंचनासाठी आणता येईल. एका कूपनलिकेसाठी रु. १.४० लाख एवढा खर्च प्रस्तावित केला असून, १८२२० कूपनलिकांसाठी रु. २५५ कोटी एवढा खर्च अपेक्षित आहे. हा कार्यक्रम नाबार्डच्या अर्थसहाय्याने राबवावयाचा असून, यासाठी शासनामार्फत सरासरी ३० टक्के अनुदान [ वैयक्तिक लाभार्थींना २५ टक्के व सहकारी संस्थांना ३५ टक्के ] प्रस्तावित करण्यात आले असून, अनुदानापोटी रु. ७६.५५ कोटी एवढा खर्च शासनाने सोसावयाचा असून रु. १७८.५५ कोटी नाबार्डमार्फत निधी उपलब्ध करून द्यावयाचा होता. एवढ्या मोठ्या प्रमाणात हा कार्यक्रम राबविण्याऐवजी सुरुवातीला ही योजना विदर्भातील ७ जिल्ह्यांत प्रायोगिक प्रकल्प म्हणून प्रत्येक जिल्ह्यांत कमीत कमी १०० असे एकूण किमान ७०० कूपनलिका घेण्याचे ठरविण्यात आले. या ७०० कूपनलिकांसाठी एकूण तरतूद रु. ९.८० कोटी व त्यापैकी रु. २.९४ कोटी एवढा आर्थिक भार शासनावर व रु. ६.८६ कोटी एवढा नाबार्डवर पडणार होता ~~त्यापैकी रु. १.४५ कोटी एवढा आर्थिक भार शासनावर रु. ५.४५ कोटी एवढा नाबार्डवर पडणार होता.~~ दरम्यानच्या काळात केंद्र शासन पुरस्कृत गंगा कल्याण योजना ही दि. २० फेब्रुवारी १९९७ च्या शासन निर्णयान्वये ८ जिल्ह्यात लागू करण्यात आली. या योजनेंतर्गत विदर्भातील बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, नागपूर, चंद्रपूर या ६ जिल्ह्यांचा समावेश आहे. बाकीच्या जिल्ह्यांमध्ये कूपनलिकेचा कार्यक्रम घेण्यास वाव नसल्याचे भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेने मत दिले आहे. त्यामुळे राज्य शासनाची वर उल्लेख केल्याप्रमाणे वेगळी योजना न राबविता उपकूपनलिकांचा समावेश असलेली गंगा कल्याण ही केंद्र पुरस्कृत योजना विदर्भातील उपरोक्त ६ जिल्ह्यांत विदर्भ विकासाच्या कालबध्द कार्यक्रमाखाली राबविण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

निर्णय :-

राज्यांमध्ये केंद्र शासन पुरस्कृत गंगा कल्याण योजना ही राज्यातील ८ जिल्ह्यांमध्ये राबविण्यांत येत असून, त्यापैकी विदर्भातील बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ, नागपूर व चंद्रपूर हे ६ जिल्हे समाविष्ट आहेत. यासाठी विदर्भातील वर उल्लेखिलेल्या ६ जिल्ह्यांमध्ये विदर्भ विकासाच्या कालबध्द कार्यक्रमांतर्गत प्रत्येक जिल्ह्यात कमीत कमी १०० कूपनलिकांचा कार्यक्रम राबविण्यास शासन मान्यता देत आहे. मात्र, या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासन पुरस्कृत गंगा कल्याण योजनेखालील उपलब्ध

करण्यात येणारा निधी वापरण्यात यावा. तसेच, शासनाच्या क्र. संकटो-१०८८/ प्र.क्र.४/१८, दि. २० फेब्रुवारी १९८७ च्या निर्णयामध्ये उल्लेखिलेल्या अटी व शर्तीचे पालन हा कार्यक्रम राबविताना करण्यात यावे. तद्वत योजना लघु पाटबंधारे [स्थानिक स्तर] मंडळ यांचे मार्फत राबविण्यात येऊन, या योजनेचे संनियंत्रण व पर्यवेक्षण वरील शासन निर्णयामध्ये उल्लेख केल्याप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांचेकडे राहील. या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र. मु. भिसीकर

[ प्र. मु. भिसीकर ]

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१] मा. राज्यपालांचे सचिव
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंधारण
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री जलसंधारण
मा. अर्थमंत्र्यांचे विशेष सहाय्यक
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
अतिरिक्त मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
विभागीय आयुक्त नागपूर, अमरावती.
प्रधान सचिव, वित्त विभाग.
प्रधान सचिव, नियोजन विभाग.
स्वीय सहाय्यक सचिव जलसंधारण
जिल्हाधिकारी, अमरावती, बुलढाणा, अकोला, यवतमाळ, नागपूर व चंद्रपूर
सचिव, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई
संचालक, कृषि महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त आदिवासी विकास, नाशिक
विशेष कार्याधिकारी व पदसिध्द उप विकास आयुक्त, रोहयो अमरावती, नागपूर